**मुंबईच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील जलवाहतूक प्रकल्पांच्या अंमलबजावणीचे अधिकार महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयडब्ल्यूटी ०२१५/प्र.क्र.३१/बंदरे-१**
मंत्रालय, मुंबई : ४०००३२,
तारीख: ३० जून, २०१५

**वाचा : शासननिर्णय, गृह विभाग, क्र. आयडब्ल्यूटी ०११२/प्र. क्र. २१/बंदरे-१, दि. ०६ मार्च, २०१२.**

**प्रस्तावना/पार्श्वभूमी :**

संदर्भाकीत शासननिर्णयान्वये मुंबईच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील जलवाहतूक प्रकल्पांच्या उभारणीकरीता अंमलबजावणी संस्था म्हणून महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची नेमणूक करण्यात आली होती. तथापि जलवाहतूक प्रकल्पांतील शासन व संबंधीत संस्थांच्या आर्थिक सहभागाचे स्वरूप निश्चीत होवू न शकल्याने प्रकल्पांच्या पायाभूत सुविधांचे बांधकाम अद्याप सुरू होवू शकले नाही. त्यामुळे अंमलबजावणी संस्था म्हणून रस्ते विकास महामंडळाच्या केलेल्या नेमणूकीचा फेरविचार करण्यात आला. हा फेरविचार करताना प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामार्फत करण्याची शक्यताही पडताळण्यात आली. या पडताळणीदरम्यान जलवाहतूक प्रकल्प राबविण्याबाबतची महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची अर्हता/ क्षमता अधोरेखित करणाऱ्या खालील बाबी निदर्शनास आल्या.

१) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम १९९६ अन्वये सन १९९६ मध्ये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची स्थापना झाली. राज्याच्या किनारपट्टीवरील लहान-मोठ्या खाड्यांमधील अस्तित्वातील जलवाहतूकीचे नियंत्रण व नियमन, त्यासाठीच्या पायाभूत सुविधा उभारणे/ सुधारणे ही कामे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामार्फत करण्यात येतात.

२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामधील सागरी अभियंता विभाग हे इनलॅण्ड व्हेसल्स ॲक्ट, १९१७ अंतर्गत जलवाहतूकीसाठी नवीन जलयान बांधणी आणि अस्तित्वात असलेली जलयाने वापरायोग्य आहेत किंवा कसे तसेच त्या जलयानांची स्थिरता (Stability and seaworthiness) इत्यादींबाबत शहानिशा करुन त्याबाबतचे सर्व्हे प्रमाणपत्र प्रदान करतात. याशिवाय, प्रवासी वाहतूकीचे जलमार्ग नौकानयनाच्या दृष्टीने सुरक्षित राहण्याकरीता जलमार्गातील गाळ उपसणे, जलमार्गावर सुरक्षित नौकानयनासाठी नौकानयन बोया(buoys) टाकणे, दीपस्तंभ उभारणे, आवश्यक तेव्हा वादळसूचक बावटे लावणे इत्यादी कामेही बोर्डाच्या सागरी अभियंता विभागामार्फत करण्यात येतात.

३) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे स्वतंत्र स्थापत्य अभियांत्रिकी पथक असून हे पथक जलवाहतूकीच्या ठिकाणी प्रवासी जेट्टी, टर्मिनल इमारत, प्रवासी शेड, जोडरस्ता इत्यादी पायाभूत सुविधांची निर्मिती करते.

४) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे आधुनिक साधनसामग्रीने युक्त अशी तीन जल आलेखन (hydrography) सर्व्हेक्षण पथके कार्यरत आहेत. ही पथके किनारपट्टीवरील नद्या/खाडयांमध्ये जलआलेखन सर्व्हेक्षण करुन त्याचे नकाशे तयार करतात.

५) किनारपट्टीवरील जलमार्गांवर सुमारे १.८० कोटी प्रवासी दरवर्षी जलवाहतूक सेवांचा वापर करीत असून प्रवासी जलवाहतूकीच्या सुविधा पुरविण्याचा व जलवाहतूक राबविण्याचा दीर्घ अनुभव महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे आहे. या बाबी विचारात घेवून मुंबईच्या किनाऱ्यावरील जलवाहतूक प्रकल्पांची अंमलबजावणी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे -

**शासन निर्णय:**

१) मुंबईच्या किनाऱ्यावरील जलवाहतूक प्रकल्पांच्या अंमलबजावणीचे अधिकार महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत करण्यात येत आहेत.

२) जलवाहतूक प्रकल्पांच्या पायाभूत सुविधांची उभारणी व त्यानंतर प्रत्यक्ष जलवाहतूक राबविण्यासाठी " अंमलबजावणी संस्था " म्हणून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड काम करेल.

३) प्रकल्पासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने प्रकल्प व्यवस्थापन सल्लागारांची (Project Management Consultant) नेमणूक करावी.

४) प्रकल्पाचा तांत्रिक व आर्थिक आराखडा निश्चीत करून त्याबाबतचा सविस्तर प्रस्ताव महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने शासनास सादर करावा.

५) संदर्भांकीत दि. ०६ मार्च, २०१२ चा शासननिर्णय ( ज्याद्वारे मुंबईच्या किनाऱ्यावरील जलवाहतूक प्रकल्पासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची अंमलबजावणी संस्था म्हणून नेमणूक करण्यात आली होती) ह्या शासन निर्णयानुसार रद्द ठरविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५३०१६५११५०२९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha Y Kamte

Digitally signed by Manisha Y Kamte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manisha Y Kamte
Date: 2015.06.30 17:00:52 +05'30'

**( म.यु.कामटे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२. मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई.
४. अप्पर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपियन सी रोड, प्रियदर्शनी पार्क, मुंबई-३६.
९. अध्यक्ष, मुंबई पोर्ट ट्रस्ट, मुंबई.
१०.व्यवस्थापकीय संचालक, सिडको, कोकण भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
११.महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, इंडियन मर्केटाईल चेंबर्स, तिसरा मजला, रामजीभाई कमानी मार्ग, बेलाई इस्टेट, मुंबई-०१.
१३.निवडनस्ती.का.बंदरे.१